प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (अनुसूचित जाती उपयोजना) (विघयो) अंतर्गत केंद्र शासनाच्या हिश्याचा पहिल्या हप्त्याचा निधी रू. ३,५१,५४,०००/- व राज्य शासनाच्या हिश्याचा निधी रू. २,३४,३६,०००/- सन २०२१-२२ या वर्षात वितरीत करणेबाबत.

## महाराष्ट्र शासन

### ग्राम विकास विभाग

### शासन निर्णय क्रमांक: प्रआयो-२०२१/प्र.क्र.५४/योजना-१०

बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २६ नोव्हेंबर, २०२१

**वाचा :-**

१) सह संचालक (ग्रामीण गृहनिर्माण), ग्रामीण विकास मंत्रालय भारत सरकार, नवी दिल्ली यांचे क्र. J-१२०२५/१/२०२०-RH-Acct.-२/A, दि.२६.०६.२०२१ रोजीचे आदेश.

२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण गृहनिर्माण यांचे पत्र क्र. राव्यक-ग्रागृ/लेखा(प्रआयो)/1st installment/ अनु.जाती./२०२१/३६२, दि.०२.०७.२०२१.

३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र. बीजीटी-२०२१/प्र.क्र.१४/अर्थसंकल्प (विघयो), दि. १२ नोव्हेंबर, २०२१.

### शासन निर्णय:-

प्रधानमंत्री आवास योजना ( ग्रामीण ) अनुसूचित जाती घटकांतर्गत केंद्र शासनाने वितरीत केलेला सन २०२०-२१ या वर्षासाठी पहिला हप्ता म्हणून रू. ३,५१,५४,०००/- (अक्षरी रूपये तीन कोटी एकावन्न लक्ष चोपन्न हजार फक्त) एवढा निधी व समरूप राज्य हिस्सा रू. २,३४,३६,०००/- (अक्षरी रूपये दोन कोटी चौतीस लक्ष छत्तीस हजार फक्त) एवढा निधी खर्च करण्यास व अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. केंद्र हिश्याचा निधी मागणी क्र. एन-३, २५०५ ग्रामीण रोजगार, ६० इतर कार्यक्रम, ७८९ अनुसूचित जातींसाठी विशेषघटक योजना (०१) (०४) प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) ३१ सहाय्यक अनुदाने वेतनेत्तर (२५०५ ए१०२) व राज्य हिश्याचा निधी मागणी क्र. एन-३, २५०५ ग्रामीण रोजगार, ६० इतर कार्यक्रम, ७८९ अनुसूचित जातींसाठी विशेषघटक योजना (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१)(०५) प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२५०५ ए१११) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. सदर खर्च सन २०२१-२२ या वर्षातील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती कार्यासन योजना-२ यांना सादर करण्यात यावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा देयक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयात नोंद झालेल्या रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

४. प्रस्तुत निधीबाबत उपसंचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण-गृहनिर्माण हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून (संकेतांक क्रमांक १२०१००५१८३) तसेच संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण - गृहनिर्माण हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर निधीचे देयके ठाणे कोषागार अंतर्गत उपकोषागार कार्यालय, कोकण भवन, बेलापूर येथे पारित करण्यात यावेत.

५. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आलेले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. १२७/अर्थसंकल्प,दि.०२.०८.२०२१ तसेच, वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.७६६, दि.२०.०८.२०२१ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२६१४४२५८६८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vasant Shinde

Digitally signed by Arun Vasant Shinde
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industries Energy & Labour Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=213d983c0c3b73519fa14c37396dd0b3cf8f28e16bc2fb6620a5c4fdac6e7284, serialNumber=672d36cc7468aa812e66dbb4704ffeb120dd58831284824f4fbec2a6f6602199, cn=Arun Vasant Shinde
Date: 2021.11.26 15:38:19 +05'30'

(अरुण व. शिंदे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (पाच जादा प्रतींसह)
२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
३) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे .

४) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर.

५) सामाजिक न्याय विभाग (वि.घ.योजना), मंत्रालय, मुंबई -३२.

६) वित्त विभाग (व्यय-१५) व (अर्थ-१७) मंत्रालय मंबई-३२.

७) कार्यासन अधिकारी, वित्त-७, वित्त-१, योजना-१, योजना-२, योजना-५ व योजना-७.

८) निवड नस्ती योजना-१० ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई.